**<u>महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बस खरेदी व बसस्थानकांचे आधुनिकीकरणांर्तगत बांधकाम व इतर सोयी सुविधा यासाठी अर्थसंकल्पिय तरतूदीतून निधी वितरीत करणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.एसटीसी-०८२०/प्र.क्र.३१५/परि-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ ऑक्टोबर, २०२०.

<u>वाचा :-</u>

**<u>संदर्भ</u>** : महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाचे पत्र क्र.राप/स्थाअ/कामे/२६८४, दि.०५.१०.२०२०.

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बस खरेदी व बसस्थानकांचे बांधकाम/दर्जावाढ व आधुनिकीकरणाकरीता शासनाद्वारे महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास भांडवली मत्तेच्या निर्मिती करीता अनुदान देण्यात येते. मा.उपमुख्य मंत्री महोदयांनी सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पीय भाषणात घोषित केल्यानुसार महामंडळाच्या बस ताफ्यातील जुन्या बस बदलून नवीन बस घेण्यासाठी तसेच बसस्थानकांचे आधुनिकीकरण व बांधकामासाठी अर्थसंकल्पात तरतूद केलेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

महामंडळाच्या बस ताफ्यातील जुन्या बस बदलून नवीन बस घेण्यासाठी तसेच बसस्थानकांचे आधुनिकीकरण व बांधकामासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता रु.५९.२६ कोटी (रुपये एकोणसाठ कोटी सव्वीस लाख फक्त) एवढा निधी "मागणी क्र. बी-३, लेखाशिर्ष ३०५५, मार्ग व परिवहन, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील इतर उपक्रमांना सहाय्य (००) (०१) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसस्थानकांच्या आधुनिकीकरणांर्तगत बांधकाम व इतर सोयी सुविधा (३०५५ ००५२)" ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या लेखाशिर्षाखाली पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर निधी वितरीत करण्यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण आधिकारी यांनी सदर रक्कम आहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्याची कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२२४/२०/व्यय-८, दि.१९.१०.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२२१५२८५७६३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NITIN JYOTINATH GHIRATKAR

Digitally signed by NITIN JYOTINATH GHIRATKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=bbb712ac44dfd391a1a4d7d8b24cf743fa81a59477dff3f6805f105ac91db1e0,
postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=21524d9e84e57776ba1ee448660f3699bdd08917801a19974a72d568f57f5401, ou=HOME DEPARTMENT GOVT OF MAHARASHTRA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=NITIN JYOTINATH GHIRATKAR
Date: 2020.10.22 15:31:28 +05'30'

**( नि. ज्यो. घिरटकर )**

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मंत्री/राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
३. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
६. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परिक्षण अधिकारी, मुंबई
९. वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१०.नियोजन विभाग (का-१४६१), मंत्रालय, मुंबई.
११.वित्त विभाग (व्यय -८/साऊ/अर्थसंकल्प-१०/अर्थोपाय) विनियम, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१२.गृह विभाग (बीयुडी-१/बीयुडी-२/परिवहन-३/परिवहन-४), मंत्रालय, मुंबई
१३.निवडनस्ती (परिवहन-१)